**सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेस फर्निचर खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएस-२०२२/प्र.क्र.२६/प्रशा-१
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१,
दिनांक : २२/०३/२०२२

वाचा :

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१/१२/२०१६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६/०७/२०१७.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४/०८/२०१७.

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/ उद्योग-४, दिनांक ०७/०५/२०२१.

५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/फर्निचर-शावैम, सिंधुदुर्ग/रा.यो.-२०२१-२२/६५९, दिनांक ३१/०१/२०२२.

६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/फर्निचर-शावैम, सिंधुदुर्ग/रा.यो.-२०२१-२२/२०७८, दिनांक १०/०३/२०२२.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त नमूद दिनांक ३१/०१/२०२२ व दिनांक १०/०३/२०२२ रोजीच्या पत्रांन्वये संचालनालयाने विभागाच्या नियंत्रणाखालील नवनिर्मित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेत आवश्यक फर्निचर खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेस सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्य योजनातंर्गत मंजूर अनुदानातून रुपये ७१,५४,१६६/- (रुपये एक्काहत्तर लक्ष, चोपन्न हजार, एकशे सहासष्ट फक्त) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद फर्निचर साहित्य खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अनु. क्र. | आवश्यक फर्निचर साहित्याचे नाव | आवश्यक नग | प्रती नग अंदाजित किंमत | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | प्लेन हॉस्पीटल बेड साईज L-७२"W-३२"H-२२ | ३० | ९९१२ | २९७३६० |
| २. | प्लेन मेटल बेड साईज L-७१"W-३०"H-२२ | ३० | ९६७६ | २९०२८० |

| अनु. क्र. | आवश्यक फर्निचर साहित्याचे नाव | आवश्यक नग | प्रती नग अंदाजित किंमत | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| ३. | प्लेन हॉस्पीटल बेड मेट्स साईड -७२ x ३६" | ६० | ४९५६ | २९७३६० |
| ४. | स्टेनलेस स्टील बेड साईड लॉकर साईज -L-१७"W-१२"H-३२ | ३० | ९३२२ | २७९६६० |
| ५. | बेड साईड लॉकर एमएस साईज L-१७"W-१२"H-३२ | १५ | ७६७० | ११५०५० |
| ६. | सलाईन स्टॅन्ड एसएस साईज L-१२"H-५६-८३" | ३० | २९५० | ८८५०० |
| ७. | फोर डोअर कबर्ड साईज ६.५ x २.७५ x १.७५ | १४ | २११२२ | २९५७०८ |
| ८. | ऑफीस कबर्ड साईज ६ x २.७५ x १.५ | १३ | २०५०० | २६६५०० |
| ९. | कबर्ड साईज ६ x २.७५ x १.५ | १४ | १९९४२ | २७९१८८ |
| १०. | लायब्रेरी बुकेस व्हर्टिकल साईज -६ x २.५ x १.५ | १ | २०५३२ | २०५३२ |
| ११. | मॅकझीन रॅक साईज ६ x २.७५ | २ | २३३६४ | ४६७२८ |
| १२. | डिलक्स हॉस्टेल बेड साईज L-७२"W-३६"H-१८ | २५ | ११९०० | २९७५०० |
| १३. | हॉस्टेल बेड साईज L-७२"W-३२"H-१८ | २५ | ११६५० | २९३७५० |
| १४. | मेटल हॉस्टेल बेड सोईज L-७१.९"W-३३"H-१७.५ | २५ | ११६०० | २९०००० |
| १५. | रेग्युलर हॉस्टेल बेड साईज L-७०"W-३१"H-१७ | २५ | ११४५० | २८६२५० |
| १६. | डिलक्स बेड मेट्रेस साईज ७२.५ x ३०.५ | ५० | ५९०० | २९५००० |
| १७. | हॉस्टेल बेड मेट्रेस साईज ७२ x ३० | ५० | ५७५० | २८७५०० |
| १८. | फॉलर बेड सेमी ॲमेस साईज -L-७२"W-३०"H-२२ | १० | २३०१० | २३०१०० |
| १९. | सेमी फॉलर बेड साईज L-७१"W-३०"H-२१.५ | ५ | २२६५६ | ११३२८० |
| २०. | सेमी फॉलर बेड मेट्रेस साईज ७२ x ३० | १५ | ६५०० | ९७५०० |
| २१. | ६ स्लेव्हस स्पेसीमन रॅक सोईज ४४ x २० x ७६ | १५ | १८७६२ | २८१४३० |
| २२. | चेंज रुम लॉकर साईज -६.५ x २.७५ x १.५ | १० | २८२०२ | २८२०२० |
| २३. | लॅबोरेटरी बोटल रॅक | २० | ८८५० | १७७००० |
| २४. | स्टेनलेस स्टील मॉडेल डिसेक्शन टेबल साईज ७८"W-३०"H-३२ | ६ | ४९५०० | २९७००० |
| २५. | डिसेक्शन टेबल एस.एस. साईज L-७७"W-२६"H-३३ | ४ | ४७७०० | १९०८०० |
| २६. | मायक्रोस्कोप लॅब्रोरेटरी टेबल विथ ट्युबलाईट साईज ४x७ | ५ | ५२७५० | २६३७५० |
| २७. | लायब्रोटरी मायक्रोटेबल विथ ट्युबलाईट साईज ३x७ | ३ | ४९५०० | १४८५०० |
| २८. | मायक्रोस्कोप लायब्रोटरी टेबल साईज ४x७ | ५ | ४५९०० | २२९५०० |
| २९. | लॅब्रोटरी मायक्रो टेबल साईज ३x७ | ३ | ४३९०० | १३१७०० |
| ३०. | लॅब्रोटरी स्टूल एसएस साईज १४" H-१८-२५ | ५० | ५७८२ | २८९१०० |

| अनु. क्र. | आवश्यक फर्निचर साहित्याचे नाव | आवश्यक नग | प्रती नग अंदाजित किंमत | एकुण किंमत |
|---|---|---|---|---|
| ३१. | लॅब स्प्रिंग स्टूल साईज L-१५"W-१५"H-२२ | ३० | ५९५० | १७८५०० |
| ३२. | पार्टीशन वर्क फॉर्म ॲनाटॉमी डिपार्टमेंट साईज २५ x ११ | १ | ९८५३० | ९८५३० |
| ३३. | डोअर फेम ॲन्ड फिटींग वॉल ॲन्ड विंडो कटींग | ३ | ३९५३० | ११८५९० |
| **एकूण किंमत (रुपयांमध्ये)** | | | | **७१,५४,१६६** |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधिन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर साधनसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

४) सदर साधनसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

५) सदर साधनसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मितीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित साधनसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

८) मुख्य साधनसामुग्री व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९) सदर विषयी साधनसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

११) समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिद्ध करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने आयुक्त , वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१२) रुपये दहा लक्ष पेक्षा कमी किंमतीची तथापी एकापेक्षा अधिक संस्थांना आवश्यक असणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची मागणी एकत्रित करून अशा बाबींची खरेदी हाफकीन महामंडळामार्फत करण्यात येईल.

१३) संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपद्धतीनुसार करताना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टल कार्यपद्धतीचा वापर करावा.

२. प्रस्तुत विषयी यंत्र/ साधनसामुग्रीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | |
|---|---|
| ४२१० | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०३ | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | विषम चिकित्सा-राज्ययोजनांतर्गत योजना |
| (००) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे |
| (३७) | बळकटीकरण व श्रेणीवर्धन आणि यंत्रसामुग्री |
| ५२ | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२२१८४४४०१६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
Date: 2022.03.24 10:10:06 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

सुधीर जया शेट्टी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति:-**

१) महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
२) व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
५) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिधुदुर्ग
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
८) निवडनस्ती (प्रशा-१)